भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील वरिष्ठ भूभौतिकतज्ञ (गट-अ) या पदावरील तात्पुरती पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** आपना-०२२३/प्र.क्र.२१३/पापु-१५
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: १५ मार्च, २०२४.

**शासन निर्णय:-**

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिनतेने पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि. ७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार व दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीनतेने श्री. शेख महंमद इर्शाद महंमद शफी, सहायक भूभौतिकतज्ञ, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना वरिष्ठ भूभौतिक तज्ञ (गट-अ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. श्री. शेख महंमद इर्शाद महंमद शफी यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे.

| अ. क्र . | सहायक भूभौतिकतज्ञ यांचे नाव | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्या कार्यरत कार्यालय | वरिष्ठ भूभौतिकतज्ञ पदावरील पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. शेख महंमद इर्शाद महंमद शफी | सर्वसा | सर्वसा | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, छत्रपती संभाजीनगर |

०२. सदर अधिकाऱ्याची वरिष्ठ भूभौतिक तज्ञ पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

पदोन्नत अधिका-याविरूध्द कोणतेही न्यायालयीन प्रकरण किंवा विभागीय चौकशी प्रस्तावित किंवा प्रलंबित नसल्याच्या अटीच्या अधिन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तथापि या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण दाखल असल्यास सदर पदोन्नतीचे आदेश आपोआप रद्द होतील.

**०३.** सदर पदोन्नती आदेशातील पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१२.०९.२०१६ नुसार कार्यवाही करण्यात येईल.

**०४.** संबंधित अधिका-याला पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी तात्काळ (अधिकाधिक सात दिवसांत) कार्यमुक्त करावे. व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. संबंधित पदोन्नत अधिका-याला सध्याच्या पदावरून कार्यमुक्त झाल्यानंतर रजेवर न जाता कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रूजू व्हावे. नवीन नियुक्तीच्या ठिकाणी आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी पदोन्नत अधिका-याला विनाविलंब रूजू करून घ्यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०५.** संबंधित पदोन्नत अधिकारी या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांत पदोन्नतीच्या पदावर रूजू न झाल्यास त्यांच्या बाबतीत शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दि.१४.०७.२०२१ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिका-याचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (Dies-non) म्हणून गणला जाईल. सदर अधिकारी ३० दिवसाच्या कालावधीत पदोन्नतीच्या पदावर रूजू न झाल्यास तसा अहवाल आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी शासनास सादर करावा.

**०६.** संबंधित पदोन्नत अधिका-याचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २३ मधील तरतूदींकडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता पदोन्नत अधिका-याने पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची निवेदने सादर केल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा नियम, १९७९ मधील नियम २३ नुसार शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

**०७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१२१५३३१४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2024.03.15 13:12:30 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.

४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१३. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१५. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. संबधित अधिकारी, (संचालनालयामार्फत).
१७. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख.
१८. निवडनस्ती, कार्यासन पापु-१५.